**बारवी धरण टप्पा क्र.३ प्रकल्पबाधित कुटुंबांना नोकरीमध्ये सामावून घेण्याकरीता अंबरनाथ नगरपरिषदेच्या आस्थापनेवर गट-क व गट-ड ची अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अंनप-२०२३/प्र.क्र.८/नवि-१९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
४ था मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२ फेब्रुवारी, २०२३.

वाचा :-

१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.ठामपा-२११७/प्र.क्र.६३/नवि-२३, दि.१८/०९/ २०१७.
२) विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, कोकण भवन, नवी मुंबई यांचे पत्र क्र.कार्या-५/नपा-५/ बारवी धरण पुनर्वसन/अंबरनाथ-बदलापूर/२०२२/१३४६, दि.२२/१२/२०२२.
३) सहआयुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई यांचे पत्र क्र.नपप्रसं/समावेशन/ बदलापूर-अंबरनाथ/नपा/बारवी धरण पुनर्वसन/प्र.क्र. /२०२२/कक्ष-४/५९८१, दि.२८/१२/२०२२.

**प्रस्तावना :-**

बारवी धरणाची उंची वाढविल्यामुळे विस्थापित झालेल्या प्रकल्पबाधितांना पाणी वापराच्या समन्यायी तत्वानुसार महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, ठाणे, मिरा-भाईंदर, कल्याण-डोंबिवली, नवी मुंबई, उल्हासनगर या महानगरपालिका व अंबरनाथ नगरपरिषदेच्या आस्थापनेवर सामावून घेण्याबाबतचा निर्णय संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, ठाणे यांनी अंतिम केलेल्या बारवी धरण प्रकल्पग्रस्तांना आरक्षित ७% पदांच्या मर्यादेत सामावून घेणेकरीता पदे उपलब्ध नसल्यास अथवा कमी पडत असल्यास गट क व गट ड मधील आवश्यक अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

त्यानुसार महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांनी बारवी धरण प्रकल्पग्रस्त कुटूंबांना नोकरी देण्यासाठी अंबरनाथ नगरपरिषदेकडे एकूण १६ उमेदवारांची यादी सादर केली असून मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद यांनी याबाबतचा प्रस्ताव विभागीय कार्यालयास दि.१५/१२/२०२२ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक कार्यालयाने संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये त्यांच्या शिफारशीसह याबाबतचा अहवाल नगरपरिषद प्रशासन संचालनालयास सादर केला. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने संदर्भ क्र.३ अन्वये अंबरनाथ नगरपरिषदेच्या आस्थापनेवर गट-क ची ७ व गट-ड ची ९ अशी एकूण १६ अधिसंख्य पदनिर्मितीचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला. त्यानुसार अंबरनाथ नगरपरिषदेच्या आस्थापनेवर सामावून घेण्यासाठी गट-क ची ७ व गट-ड ची ९ अशी एकूण १६ अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेमध्ये नमूद केल्यानुसार, तसेच नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने केलेल्या शिफारशीनुसार बारवी धरण प्रकल्पग्रस्तांना अंबरनाथ नगरपरिषदेच्या आस्थापनेवर सामावून घेण्यासाठी खालीलप्रमाणे गट-क ची ७ व गट-ड ची ९ अशी एकूण १६ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संवर्गाचे नाव | वर्ग | अधिसंख्य पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | लिपिक | क | ०७ |
| २ | उद्यान मजूर | ड | ०२ |
| ३ | शिपाई | ड | ०७ |
| | | **एकूण** | **१६** |

०२. यासंदर्भात नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई, तसेच अंबरनाथ नगरपरिषद यांनी दिनांक १८ सप्टेंबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार कार्यवाही करावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२२१७२०४९३०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE

Digitally signed by RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=58f272615d694188999d7059c35044b641a6f79b7f11b072357a034f1945b5bf, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=790D7A8A18A9128F2444E4F50CEC8C48E1E5B4AC49A5B5B6D6596149B3010E5B, cn=RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE
Date: 2023.02.22 17:24:57 +05'30'

**( रश्मिकांत इंगोले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई.
३. प्रादेशिक उपसंचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई.
४. जिल्हाधिकारी, ठाणे.
५. मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद, अंबरनाथ जि.ठाणे.
६. निवडनस्ती (नवि-१९).